जिल्हा रुग्णालय, सोलापूर येथील इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रक व आराखड्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा-२०२१/ प्र.क्र.१०६/ आरोग्य-३अ**
मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
दिनांक : ०४ मार्च , २०२२.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : प्रशामा-२०१६ /प्र.क्र.११३ / आरोग्य-३अ, दि. ०५.११.२०१६

२) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/कक्ष-३/टे.६/जिरुसोलापूर१००खाटासुधाप्रमा/७००४-०५/२१, दिनांक १६.०४.२०२१

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधिन अनुक्रमांक १) येथील दि.०५.११.२०१६ च्या शासन निर्णयान्वये, सोलापूर येथील १०० खाटांचे जिल्हा रुग्णालय व १०० खाटांचे महिला व नवजात शिशु रुग्णालय इमारत बांधकामास प्रत्येकी रु.२०३३.९० लक्ष एवढ्या रक्कमेच्या अंदाजपत्रक व नकाशांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. आता सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक २) येथील दिनांक १६ एप्रिल, २०२१ च्या पत्रान्वये, १०० खाटांचे जिल्हा रुग्णालय या इमारतीच्या बांधकामाचे कामाच्या किंमतीमध्ये वाढ होत असल्यामुळे अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केलेला आहे. सदर १०० खाटांच्या जिल्हा रुग्णालयाच्या इमारतीच्या बांधकामाचे सुधारीत अंदाजपत्रक व आराखडे सहायक अभियंता, सार्वजनिक बांधकाम युनिट क्रमांक १, सोलापूर यांनी तयार केले असून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर , अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सोलापूर, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे , उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे तसेच जिल्हा शल्य चिकित्सक, सोलापूर यांनी साक्षांकित केले आहे. सदरहू अंदाजपत्रकास

सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा आरोग्य सेवा आयुक्तालयाचा उपरोक्त प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :-

जिल्हा रुग्णालय, सोलापूर येथील रुग्णालयाच्या इमारत बांधकामाच्या रु. ३८,३१,१७,३८४/- ( रुपये अडतीस कोटी, एकतीस लक्ष, सतरा हजार, चौ-यांशी फक्त) इतक्या रक्कमेस खालीलप्रमाणे सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अं.क्र | व्यापती | तपशील | मूळ प्रशासकीय मान्यता | सुधारीत अंदाजित | अधिक्य रुपये | अधिक्य कारण अथवा बदलाबाबत प्राधिकरण संदर्भ |
|---|---|---|---|---|---|---|
| | | बाब | किंमत (रुपये) | किंमत (रुपये) | किंमत (रुपये) | |
| | | | | | | |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** |
| **अ** | **स्थापत्य (विद्युत व पाणीपुरवठा सोडुन सर्व)** | | | | | |
| १ | मुळ बाबी | मुख्य इमारत | १४०४०५७५० | २४४३२४२३० | १०३९१८४८० | १.मूळ प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रक हे दरसुची सन २०१२-१३ वर आधारीत असुन, तांत्रिक मान्यता अंदाजपत्रकातील दर हे सन २०१७-१८ दरसुचीचे आहेत. तसेच निविदा स्विकृती सन २०१९-२० च्या दरांशी तुलना करुन करण्यात आलेली आहे. २. मूळ प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकापेक्षा प्रत्यक्षात इमारतीच्या क्षेत्रफळात वाढ झालेली असल्याने ३. मूळ प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकामध्ये इमारतीचे बांधकाम तळ मजला + २ मजले अशी प्रस्तावित आहे. तथापि मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य, यांच्या दि.२८/११/२०१७ रोजीच्या प्रकल्पाच्या सादरी करणावेळी मा. मंत्री |
| २ | | संरक्षक भिंत | २०००००० | ४००७१०५ | २००७१०५ | |
| ३ | | अंतर्गत कॉक्रिट रस्ते | २०००००० | ११२६३६५८ | ९२६३६५८ | |
| ४ | | गौण खनिज | ---- | १०३७६५३ | १०३७६५३ | |
| ५ | | बांधकाम साहित्य तपासणी | ---- | १२५४१५५ | १२५४१५५ | |
| ६ | | सेवा कर १२% | ----- | ३२२४०२४५ | ३२२४०२४५ | |
| | | **एकुण अ (१)** | **१४४४०५७५०** | **२९४१२७०४६** | **१४९७२१२९६** | |
| ७ | नवीन बाबी | पोस्ट मार्टम रुम | ---- | ४०५८१५० | ४०५८१५० | |
| ८ | | RCC गटार बांधकाम | ---- | ५०१५५६९ | ५०१५५६९ | |
| | | **एकुण अ (२)** | ---- | **९०७३७१९** | **९०७३७१९** | |
| | | **एकुण अ** | **१४४४०५७५०** | **२६७१०७११४** | **१२२७०१३६४** | |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | महोदय यांनी सदर इमारतीची क्षमता १०० खाटांऐवजी २०० खाटांचे करण्याच्या सुचना आदेश दिलेले असल्याने, सदर इमारतीचे आर.सी.सी संकल्पन (तळ मजला+४) असे करण्यात आलेले आहे. |
| **ब** | **विद्युत** | | | | | |
| ९ | मुळ बाबी | विद्द्युतिकरण ५ टक्के (अंर्तगत) | ७०२०२८८ | १९९५५००० | १२९३४७१२ | ४. मूळ प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकामध्ये |
| १० | | विद्द्युतिकरण ६ टक्के (बाहय) | ८४२४३४५ | ७४४२००० | (-) ९८२३४५ | हरित इमारत संकल्पनेचा समावेश नाही, शासनाच्या |
| | | **एकुण ब (१)** | **१५४४४६३३** | **२७३९७०००** | **११९५२३६७** | निर्देशाप्रमाणे सदर इमारत हरित इमारत करीता |
| ११ | नवीन बाबी | निरंक | ---- | ---- | ---- | नोंदणी केलेली असुन, हरित इमारत संकल्पनेच्या |
| | | **एकुण ब (२)** | ---- | ---- | ---- | कामांमुळे (संदर्भ परिशिष्ठ क्र.४) |
| | | **एकुण ब** | **१५४४४६३३** | **२७३९७०००** | **११९५२३६७** | ५. मूळ प्रशासकीय मान्यते मध्ये संरक्षक भिंत |
| **क** | **पाणीपुरवठा** | | | | | १४४.०० मीटर ग्रहित |
| १२ | मुळ बाबी | पाणी पुरवठा व मलःनिसारण | ७०२०२८८ | ---- | (-)७०२०२८८ | धरण्यात आलेली होती. प्रत्यक्षात उपमुख्य |
| १३ | | फर्निचर | २५००००० | २५००००० | ---- | वास्तुशास्त्र यांच्या अद्ययावत |
| १४ | | जल पुनर्भरण | ७०२०२८८ | ---- | (-) ७०२०२८८ | आराखड्यानुसार |
| १५ | | अग्निशमन यंत्रणा | १०००००० | ११०५६००० | १००५६००० | इमारतीस शोभेल अशी समोरील बाजूची संरक्षक |
| १६ | | सौर ऊर्जा व पथ दिवे यंत्रणा | १०००००० | १३५०००० | ३५०००० | भिंत नव्याने करण्यात येत आहे. (संदर्भ परिशिष्ठ |
| १७ | | अस्तित्वातिल जुनी इमारत पाडणे | १४०४०५८ | ---- | (-) १४०४०५८ | क्र.५) ६.मुळ प्रशासकिय |
| | | **एकूण क (१)** | **१९९४४६३४** | **१४९०६०००** | **(-) ५०३८६३४** | मान्यता अंदाजपत्रकामध्ये अंतर्गत कॉक्रिट रस्ते |
| १८ | नवीन बाबी | निरंक | ---- | ---- | ---- | १३०.०० मीटर लांबचे ग्रहित धरण्यात आलेली |
| | | **एकुण क(२)** | ---- | ---- | ---- | होते. तथापि अद्ययावत |
| | | **एकुण क** | **१९९४४६३४** | **१४९०६०००** | **(-)५०३८६३४** | आराखड्यानुसार सदरची |
| १९ | | आकस्मिक निधी ४% | ५६१६२३० | १०७४६७४८ | ५१३०५१८ | लांबी ६००.०० मीटर इतकी करणे आवश्यक |
| २० | | भाववाढ १०% | १७९७९५०२ | २६८६६८७१ | ८८८७३६९ | आहे. (संदर्भ परिशिष्ठ क्र.५) |
| | | **एकुण ड** | **२३५९५७३२** | **३७६१३६१९** | **१४०१७८८७** | ७. अधिष्ठता, डॉ. |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | **मुळ बाबी** | **अ(१)+ब(१)+क (१)** | **२०३३९०७४९** | **३७४०४३६६५** | **१७०६५२९१६** | वैंशपायन स्मृति शासकिय महाविद्यालय यांच्या मुलांच्या वस्तीगृहासाठी पुर्वकडील रस्ता कायमस्वरुपी करण्यासाठी मंजुर वास्तु मांडणी आराखडयामध्ये बदल झाल्याने, जिल्हा रुग्णालयाची ईमारत जागा ही संपुर्ण आवराच्या सखल पातळीमध्ये बांधकाम केल्याने अतिरिक्त मजला वाढ झालेली आहे.<br>८. सदरची इमारत अद्ययावत प्रकारची होणार असल्याने दोन रखवालदार खोली व इमारतींच्या देखभाल व दुरुस्तीसाठी सेवा केंद्र (बांधकाम विभागाचे) नव्याने प्रस्तावित करण्यात येत आहे.<br>९. मूळ प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकामध्ये १२% सेवा कराचा समावेश नाही. परंतु तांत्रिक मंजुरी अंदाजपत्रकामध्ये समाविष्ठ असल्याने (संदर्भ परिशिष्ठ क्र. ६)<br>१०. चालू दर सूचितील फरकामुळे, विद्युत कामाच्या अंदाजपत्रकामध्ये वाढ होत असल्याने प्रकल्पाच किमंतीमध्ये वाढ होत आहे. |
| | **नवीन बाबी** | **अ(२)+ब(२)+क (२)** | ---- | **९०७३७१९** | **९०७३७१९** | |
| | **एकुण** | **अ+ब+क** | **२०,३३,९०,७४९** | **३८,३१,१७,३८४** | **१७,९७,२६,६३५** | |

अटी व शर्ती :-

१) काम सुरु करण्यापुर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र. १७७/तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि. ०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

५) नियोजित जागा ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

६) सदर काम मंजूर रक्कमेत पुर्ण होईल याची दक्षता घेण्यात यावी. तसेच सदर काम उपलब्ध निधी मधून करण्यात यावे.

७) सदर जिल्हा रुग्णालय, सोलापूर येथील रुग्णालयाच्या इमारत बांधकामाच्या सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावास व्यय अग्रक्रम समितीने खालील अटींच्या अधीन राहून सहमती दर्शविली आहे. खालील अटींची पूर्तता करण्याची सर्वस्वी जबाबदारी उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे, जिल्हा शल्य चिकित्सक, सोलापूर व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर यांची राहील.

अ) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहीत निविदा कार्यपध्दती अनुसरणे याची सर्वस्वी जबाबदारी विभागाची राहील.

ब) सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रीय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी विभागाची राहील.

३. सदर बांधकामांवरील होणारा खर्च मुख्यलेखाशिर्ष “४२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य ), ११० -रुग्णालये व दवाखाने, (०१) (अ) - पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना-इमारती, (००) (०१)- मोठी बांधकामे (४२१० ००१४), ५३- मोठी बांधकामे” या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६४/२०२१/इमा-२, दि.२०/०५/२०२१ अन्वये दर्शविलेल्या सहमतीनुसार, मा. उपमुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखालील व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक २५ नोव्हेंबर, २०२१ रोजी झालेल्या बैठकीत समितीने दिलेल्या मान्यतेनुसार, मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार सचिव समितीने दि.२४.०२.२०२२ रोजी दिलेल्या मान्यतेनुसार व वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३० /२०१३ /विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ परिच्छेद क्र.१३४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०४१३३०५७९५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK NIVARTTI KENDRE

Digitally signed by DEEPAK NIVARTTI KENDRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=40fdba39a26dd429d5be80f9cd76998906ed5012a776fbe5072661d97c2c56c9, pseudonym=BF4C0C742439A64408C0621CD1FF33CD1AD8C6B9, serialNumber=C351F74FB3439ACA71466FCFBB2509C3310AE753E395A89FFA7C6E3887B0AADF, cn=DEEPAK NIVARTTI KENDRE
Date: 2022.03.04 16:25:12 +05'30'

(दी. नि. केंद्रे
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक (१), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
५. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर
९. जिल्हा शल्य चिकित्सक, सोलापूर
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
११.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१२.विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.अवर सचिव ( अर्थसंकल्प ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.अवर सचिव (आरोग्य-३), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.निवडनस्ती ( आरोग्य-आ३अ ).